मराठी भाषा विद्यापीठाची स्थापना करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१०/प्र.क्र.१२८/विशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
दिनांक : ११ जुलै, २०२३.

**प्रस्तावना :-**

राज्यात मराठी भाषेचे विद्यापीठ स्थापन करण्यासाठी राज्यातील विधीमंडळ सदस्य, अखिल भारतीय साहित्य महामंडळ, अखिल भारतीय महानुभाव साहित्य युवामंच, जागतिक महानुभाव वासनिक परिषद अशा विविध संघटना व व्यक्तींकडून राज्यात मराठी भाषेचे विद्यापीठ स्थापन करण्याची मागणी करण्यात आलेली आहे.

२. सन २०२३ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनामध्ये मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांनी राज्याचा सन २०२३-२४ चा अर्थसंकल्प विधानसभेत दिनांक ९ मार्च, २०२३ रोजी सादर केला. त्यावेळी रिद्धपूर, जि.अमरावती येथे मराठी भाषा विद्यापीठ स्थापनेबाबत घोषणा करण्यात आली आहे.

३. उपरोक्त पार्श्वभूमीवर राज्यात मराठी भाषा विद्यापीठ स्थापनेबाबत समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यात मराठी भाषा विद्यापीठ स्थापनेच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. सदानंद मोरे, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ | अध्यक्ष |
| २ | महाराष्ट्र विधानमंडळ मराठी भाषा समिती अध्यक्ष/सदस्य | सदस्य |
| ३ | डॉ. विद्या रत्नाकर पाटील (व्यवहारे) | सदस्य |
| ४ | प्रो. राजेश नाईकवाडे, नागपूर | सदस्य |
| ५ | सह सचिव, मराठी भाषा विभाग | सदस्य |
| ६ | विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग, अमरावती | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

१) मराठी भाषा विद्यापीठाचे स्थान, आवश्यक जमीन, बांधकाम- जागेची आवश्यकता, योग्यता या सर्व बाबी विचारात घेऊन शिफारस करणे.
२) विद्यापीठ स्थापनेच्या अनुषंगाने खर्चाचा अंदाज, अध्यापक, अध्यापकेत्तर कर्मचारी किती असावेत, राज्यावर किती आर्थिक भार पडणार आहे, यासंदर्भात तपशीलवार माहिती सादर करणे.
३) विद्यापीठाचे विविध विभाग व विद्यापीठाची सर्वसाधारण रचना याबाबतचा सविस्तर आराखडा.
४) विद्यापीठात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना शिक्षणाबरोबरच रोजगाराच्या संधी कशा प्रकारे उपलब्ध होतील, याबाबत शिफारस करणे.
५) पारंपारिक विद्यापीठात मराठी भाषा विभाग कार्यरत असताना, मराठी विद्यापीठ स्थापन केल्यामुळे मराठी भाषा संवर्धन करण्याकरिता गुणात्मक पडणाऱ्या फरकाची तुलनात्मक माहिती सादर करणे.
६) भविष्यात उच्च शिक्षण मातृभाषेतून देणेबाबत पर्याय उपलब्ध करुन देण्यासाठी धोरणात्मक निर्णय घेणेबाबत शक्यता तपासून अभियांत्रिकी, वैद्यकीय सारखे अभ्यासक्रम मराठीतून शिकविण्यासाठी आवश्यक बाबी, यंत्रणा याबाबत व तद्नुषंगिक शिफारशी करणे.

७) दूरस्थ/ऑनलाईन पद्धतीने सर्व अभ्यासक्रम मराठीतून शिकविण्याबाबत आवश्यक यंत्रणा, अडचणी व उपाय योजना याबाबतचा अभ्यास व तपशील
८) विद्यापीठाचे स्वरुप एकल असेल की, इतर महाविद्यालयांचे संलग्नीकरण असेल याबाबत सर्व बाबी विचारात घेऊन शिफारस करणे.
९) मराठीच्या सर्व बोली भाषांच्या संवर्धनासाठी विद्यापीठांतर्गत उपाययोजना
१०) इतर राज्यातील अन्य भाषांसाठी स्थापित विद्यापीठांच्या कामगिरीचा अभ्यास करुन मराठी भाषा विद्यापीठासाठी आवश्यक बाबी आणि येणाऱ्या अडचणींवर उपाययोजना सूचविणे.
११) प्रस्तावित विद्यापीठात शिकविण्यात येणारे अभ्यासक्रम केंद्र शासनाच्या / विद्यापीठ अनुदान आयोगाच्या नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाशी सुसंगत करण्याच्या दृष्टीने शिफारशी करणे.

उपरोक्त कार्यकक्षेतील मुद्दे तसेच समिती विद्यापीठ स्थापनेसाठी योग्य वाटतील अशा बाबींसाठी विविध तज्ञ व्यक्ती आणि संस्था यांचेशी विचारविनिमय करुन सर्व समावेशक सविस्तर तपशीलासह दोन महिन्यांत शासनास अहवाल सादर करील.

सदर समितीतील अशासकीय सदस्यांना प्रवासभत्ता अनुज्ञेय राहील. त्याबाबतची तरतुद सह संचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग, अमरावती यांच्या कार्यालयीन खर्चासाठीच्या उपलब्ध निधीतून करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१११३०४१६०५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.07.11 13:08:03 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.राज्यपाल कार्यालयाचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री कार्यालयाचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. उपमुख्यमंत्री कार्यालयाचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खा़जगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५) श्री. सदानंद मोरे, अध्यक्ष,महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.
६) अध्यक्ष, मराठी भाषा समिती, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
७) डॉ. विद्या रत्नाकर पाटील (व्यवहारे),
८) प्रो. राजेश नाईकवाडे, नागपूर
९) सह सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग, अमरावती.
११) संचालक, तंत्र शिक्षण, मुंबई यांचे कार्यालय.
१२) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे कार्यालय.
१३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१४) उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) निवडनस्ती (विशि-४).